जिल्हा परिषदेतील गट-“ क ”व गट-“ ड ”ची रिक्त पदे भरण्याबाबत सुधारीत सूचना.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन परिपत्रक क्र. एपिटी-२०१४/प्र.क्र -१३९ / आस्था-८,

२५- मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट,
मंबई-४०० ००१,
दिनांक - ८ ऑक्टोबर, २०१५.

वाचा -

१) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग,क्र. एपिटि-२०१४/प्र.क्र १३९/आस्था-८ दि,२१ एप्रिल २०१५

२) शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग,क्र. एपिटि-२०१४/प्र.क्र १३९/आस्था-८ दि,१४ सप्टेंबर २०१५

परिपत्रक

संदर्भाधिन क्रमांक (२ ) येथील दिनांक १४ सप्टेंबर २०१५ च्या शासन परिपत्रकान्वये जिल्हा परिषदेतील गट“क ” व गट “ड ” संवर्गातील सरळसेवेची रिक्त पदे भरण्याच्या अनुषंगाने सुचना व त्या सोबत परीक्षेचे वेळापत्रक सर्व संबंधिताना कळविण्यात आले आहे.

२. मात्र १ नोव्हेंबर २०१५ रोजी राज्यभरात ग्रामपंचायत निवडणुका असल्याने दि.१ नोव्हेंबर २०१५ रोजी आयोजित केलेल्या ९८ संवर्गासहित सर्व संवर्गाच्या परीक्षा घेण्याबाबतचे सुधारित वेळापत्रक सोबत जोडले आहे.

३. तसेच दि. २१.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या अन्य सूचना कायम असून त्यात कोणताही बदल नाही.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५१००६१२०७५०८२२० असा आहे सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Eknath Kulkarni

Digitally signed by Anil Eknath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Anil Eknath Kulkarni
Date: 2015.10.09 11:20:37 +05'30'

( अ.ए. कुळकर्णी )

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
४) सर्व सह / उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
५) निवड नस्ती, कार्यासन आस्था.-८

रिक्त पदे भरण्याबाबतचे वेळापत्रक

| अ.क्र. | परीक्षेचा दिनांक | वेळ | पदनाम |
|---|---|---|---|
| १) | ८ नोव्हेंबर | सकाळी १०.०० ते ११.३० | औषध निर्माता/ वरिष्ठ सहाय्यक (लेखा )/ कृषि अधिकारी |
| | | दुपारी २.०० ते ३.३० | आरोग्य सेवक (पुरुष)/ आरोग्य सेवक (महिला) /कनिष्ठ आरेखक/पर्यवेक्षिका (एकात्मिक बाल विकास सेवा योजना )/ विस्तार अधिकारी (कृषि) |
| २) | २२ नोव्हेंबर | सकाळी १०.०० ते ११.३० | कंत्राटी ग्रामसेवक / आरोग्य पर्यवेक्षक |
| | | सकाळी १०.०० ते ११.०० | जोडारी/कनिष्ठ यांत्रिकी/तारतंत्री |
| | | दुपारी २.०० ते ३.३० | विस्तार अधिकारी (पंचायत) /आरेखक/ स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक (समावेशनाची पदे वगळून ) |
| ३) | २८ नोव्हेंबर | सकाळी १०.०० ते ११.३० | वरिष्ठ सहाय्यक (लिपिक) / पशुधन पर्यवेक्षक/कनिष्ठ अभियंता/ कनिष्ठ सहाय्यक (लेखा) |
| | | दुपारी २.०० ते ३.३० | कनिष्ठ सहाय्यक ( लिपिक) / प्रयोगशाळा तंत्रज्ञ/विस्तार अधिकारी (शिक्षण) वर्ग ३ श्रेणी-२ |
| ४) | २९ नोव्हेंबर | सकाळी १०.०० ते ११.३० | विस्तार अधिकारी (सांख्यिकी)/ लघुलेखक |
| | | दुपारी २.०० ते ३.३० | कनिष्ठ लेखा अधिकारी / परिचर / पट्टीबंधक |